राज्य योजना सन २०२१-२२
**गोरेवाडा येथील प्रस्तावित प्राणी संग्रहालयाची प्राथमिक कामे (४४०६-३८५८) या योजनेतर्गत निधी वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : डब्ल्यूएलपी- ११.२१/प्र.क्र. ३०४/फ-१**
मंत्रालय, मुंबई ४०००३२.
दिनांक :- २७ डिसेंबर, २०२१.

वाचा :-

१. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक : अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक ०६.०४.२०२१.
२. वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक : अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक २४.०६.२०२१.
३. वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक : अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक १४.१०.२०२१.
४. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक : कक्ष-१/पी/चाबाप्र/प्र.क्र. ७७/२८७/२०२१-२२, दिनांक २२.१०.२०२१.

**प्रस्तावना :-**

सन २०२१-२२ आर्थिक वर्षाकरिता गोरेवाडा येथील प्रस्तावित प्राणी संग्रहालयाची प्राथमिक कामे (४४०६-३८५८) या लेखाशिर्षाअंतर्गत एकूण रु. ७५००.०० लक्ष नियतव्यय अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. वित्त विभागाच्या संदर्भ क्र.१, २ व ३ चे शासन निर्णयान्वये सन २०२१-२२ मध्ये निधी वितरणाच्या अनुषंगाने मार्गदर्शक सूचना जारी करण्यात आल्या आहेत.

संदर्भ क्रमांक ४ च्या पत्रान्वये प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी गोरेवाडा येथील प्रस्तावित प्राणी संग्रहालयाची प्राथमिक कामे (४४०६-३८५८) या योजनेतर्गत रू. २०००.०० लक्षचे प्रस्ताव शासन मान्यतेसाठी सादर केले असून त्या अनुषंगाने शासन पुढील निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

वित्त विभागाचे संदर्भ क्रमांक १, २ व ३ चे शासन निर्णय विचारात घेता प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्रमांक ४ च्या पत्रान्वये केलेली निधीची मागणी लक्षात घेऊन गोरेवाडा येथील प्रस्तावित प्राणी संग्रहालयाची प्राथमिक कामे (४४०६-३८५८) या लेखाशिर्षातील **५०-इतर खर्च** या उद्दीष्टांतर्गत **रु. १०६०.८९ लक्ष** इतका निधी खालील तक्त्यात नमुद कार्यबाबीकरीता खालील अटी व शर्तीचे अधिन राहून वितरीत करण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे:

**(रु. लाखात)**

| अ.क्र. | कामाचा तपशिल | प्रस्तावित रक्कम. |
|---|---|---|
| १ | वन्यप्राणी बचाव केंद्राचे व गोरेवाडा आंतरराष्ट्रीय प्राणी उद्यान नागपूर येथील रखरखावट, परिरक्षण मनुष्यबळ पुरवठा, (वन्यप्राण्याकरीता दैनंदिन खाद्य, औषधी, कार्यालयीन खर्च, वैद्यकीय उपकरणे / इतर उपकरणे) इत्यादी. | १०६०.८९ |

I. प्रस्तावीत खर्च:- लेखाशिर्ष ४४०६, वनीकरण व वन्य जीवन यांवरील भांडवली खर्च ०२, पर्यावरणीय वनीकरण व वन्यजीवन, १११ प्राणी संग्रहालय, (००) (०१) गोरेवाडा येथील प्रस्तावित प्राणी संग्रहालयाची प्राथमिक कामे (राज्य) ४४०६ ३८५८ या लेखाशिर्षाखाली सन २०२१-२२ मध्ये अर्थसंकल्प वितरण प्रणालीद्वारे उपलब्ध होणा-या अनुदानातून खर्च करण्यात यावा.

II. योजनांतर्गत प्रस्तावीत कार्यबाबींना आवश्यकतेनुसार सक्षम प्राधिकाऱ्यांनी प्रशासकीय व तांत्रिक मान्यता प्रदान केलेली आहे याची खातरजमा झाल्यानंतरच, प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी सदर निधी वितरीत करावा.

III. वितरीत केलेला निधी शासनाने दिलेल्या मान्यतेनुसार योजनेत विहीत केलेल्या मर्यादेत, प्रचलित नियमांच्या अधीन राहून, प्रचलित धोरण व वित्त विभागाने वेळोवेळी विहीत केलेल्या मार्गदर्शक तत्त्वानुसार तसेच प्रस्तावात नमूद केलेल्या कार्यबाबींच्या अनुषंगाने खर्च करण्यात यावा.

IV. प्रस्तावित असलेल्या मोठ्या बांधकामासाठी शासनाने दिलेल्या सूचना आणि विहीत केलेली कार्यपद्धती अनुसरण्याची संबंधित जबाबदारी नियंत्रक/अंमलबजावणी अधिकारी यांची राहील. कोणत्याही प्रकारची वित्तीय अनियमितता होऊ न देण्याचीही जबाबदारी त्यांची असेल.

V. कार्यबाबींमध्ये खरेदीचा समावेश असल्यास शासनाने विहित केलेल्या पध्दतीचा अवलंब करुन खरेदी करण्यात यावी.

VI. वित्त विभागाने निर्गमित केलेल्या विविध मार्गदर्शन सूचनांचे व वित्त विभाग, शासन परिपत्रक, क्रमांक : अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक ०६.०४.२०२१, वित्त विभाग, शासन निर्णय, क्रमांक : अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक २४.०६.२०२१ व वित्त विभाग, शासन निर्णय, क्रमांक : अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक १४.१०.२०२१ चे काटेकोर पालन करावे.

२. सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय, क्रमांक : अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक २४.०६.२०२१ व वित्त विभाग, शासन निर्णय, क्रमांक : अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक १४.१०.२०२१ ला अनुलक्षून निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या *www.maharashtra.gov.in* या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२११२२७१४४७४३४७१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SIDDESH TUKARAM SAWARDEKAR

Digitally signed by SIDDESH TUKARAM SAWARDEKAR
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7dc40890d791d1b1e6bae88da52eabb63f1f3ab6258c7e318f8c37f3ae7c36f2, serialNumber=5712ce2d7a095c22e97ebb8f03c668b12eba1db0dd8e284883b7bd7fa74da65d, cn=SIDDESH TUKARAM SAWARDEKAR
Date: 2021.12.27 14:48:52 +05'30'

**(सिध्देश सावर्डेकर)**
**विशेष कार्य अधिकारी**
**महसूल व वन विभाग**

**प्रत,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. व्यवस्थापकीय संचालक, एफ.डी.सी.एम.ली., नागपूर.
४. महालेखापाल१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखापरिक्षण), मुंबई/नागपूर.
५. ब-१, फ-२,फ-१ कार्यासन (निवडनस्ती), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.